“चांदा ते बांदा”योजनेंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षात मागणी क्र.ओ-०७, लेखाशिर्ष “३४५१-सचिवालयआर्थिक सेवा, ०९०-सचिवालय, (०५) चांदा ते बांदा विशेष कार्यक्रम, (०५)(०१) चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यामध्ये साधन संपत्तीवर आधारीत सधन नियोजन व विकास कार्यक्रम राबविणे (३४५१A०१९)” निधी पुर्नवितरण करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- चांबांयो-२०१९/प्र.क्र.५३/का.१४१८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १८ नोव्हेंबर, २०१९.

वाचा:

१) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. डिएपी-१०१५/प्र.क्र.५१/का.१४८१, दि. २९.०६.२०१६.
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. डिएपी-१०१६/प्र.क्र.१८६/का.१४८१, दि. १८.११.२०१६.
३) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. चांबांयो-२०१९/प्र.क्र.५३/का.१४१८, दि.२३.०४.२०१९.
४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. चांबांयो-२०१९/प्र.क्र.५३/का.१४१८, दि.०८.०५.२०१९.
५) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. चांबांयो-२०१९/प्र.क्र.५३/का.१४१८, दि.२४.०७.२०१९.
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८.०७.२०१९.
७) जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांचे पत्र क्र.PLAN-चांदा ते बांदा/५७३, दि.०३.०७.२०१९ व पत्र क्र.१३२३, दि.२४.०९.२०१९.
८) कक्ष अधिकारी, का.१४२२, नियोजन विभाग, मंत्रालय याची टिपणी दि.०५.१०.२०१९.

**शासन निर्णय:-**

चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यातील नैसर्गिक साधनसंपत्तीचा इष्टतम वापर होण्यासाठी सधन नियोजन व अंमलबजावणीचा विशेष कार्यक्रम राबविण्याच्या अनुषंगाने संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यामध्ये “चांदा ते बांदा” योजना राबविण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये राज्य व जिल्हा स्तरावर “राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष” व “जिल्हा प्रकल्प व्यवस्थापन कक्ष” स्थापन करण्यात आला आहे. सदरहू व्यवस्थापन कक्षासंबधात होणारा कार्यालयीन खर्च तसेच इतर प्रशासकीय कामासाठी लागणा-या खर्चाकरिता निधी उपलब्ध करून देणे आवश्यक आहे.

२. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांनी संदर्भाधीन क्र.७ येथील पत्रानुसार व का.१४२२, नियोजन विभाग, यांनी दि.०५.१०.२०१९ च्या टिपणीनुसार “चांदा ते बांदा” कार्यक्रमाकरीता सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी मागणी क्र.ओ-७, लेखाशिर्ष “३४५१A०१९” याखाली उद्दीष्ट “१३-कार्यालयीन खर्च” अंतर्गत झालेल्या खर्चाचे देयक मंजुरीसाठी निधीची मागणी केलेली आहे. सदर मागणी विचारात घेऊन सन २०१९-२० साठी मागणी क्र.ओ-०७, लेखाशिर्ष “३४५१-सचिवालय आर्थिक सेवा, ०९०-सचिवालय, (०५) चांदा ते बांदा विशेष कार्यक्रम, (०५)(०१) चंद्रपूर व सिंधुदुर्ग या

जिल्ह्यामध्ये साधन संपत्तीवर आधारीत सधन नियोजन व विकास कार्यक्रम राबविणे (३४५१A०१९)” या अंतर्गत “५१-मोटार वाहने” या उद्दीष्टाखाली मंजुर अनुदान (अर्थसंकल्पित तरतूद) रु.२५.०० लक्ष निधीपैकी रु.३.०० लक्ष (रु.तीन लक्ष फक्त) इतका निधी खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे “१३-कार्यालयीन खर्च” या उद्दीष्टाखाली पुनर्वितरीत करण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| लेखाशिर्ष | उद्दीष्ट | मंजुर अनुदान | पुनर्वितरणद्वारे निधीत केलेली घट/वाढ रक्कम | | पुनर्वितरणा नंतर एकुण मंजुर अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| | | | घट (-) | वाढ (+) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| मागणी क्र.ओ-०७, लेखाशिर्ष “३४५१-सचिवालय आर्थिक सेवा, ०९०-सचिवालय, (०५) चांदा ते बांदा विशेष कार्यक्रम, (०५)(०१) चंद्रपूर व सिंधुदुर्ग या जिल्ह्यामध्ये साधन संपत्तीवर आधारीत सधन नियोजन व विकास कार्यक्रम राबविणे (३४५१A०१९)” | ५१-मोटार वाहने | २५.०० | ३.०० | ०.०० | २२.०० |
| | १३-कार्यालयीन खर्च | ७.०० | ०.०० | ३.०० | १०.०० |
| | **एकूण** | **३२.००** | **३.००** | **३.००** | **३२.००** |

३. वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९७८, भाग पहिला, उपविभाग-तीन मधील अनुक्रमांक-३, परिच्छेद क्र.१६६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. नियोजन विभागाचा हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९१११८१५३३५४७३१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vanita Narayan Jadhav

Digitally signed by Vanita Narayan Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f0e1884948542877a779b797fc357f1c34d84fe1aa3f9bdc30c060e0431223f, serialNumber=ad56893b2ddc6497ed23d778715c30a6ea094f5d1e0fb38a44ac5b9179a65d83, cn=Vanita Narayan Jadhav
Date: 2019.11.18 15:36:57 +05'30'

**( वनिता ना.जाधव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपुर.
२. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग.
३. उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, नवी मुंबई.
४. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती सिंधुदुर्ग.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, सिंधुदुर्ग.

६. जिल्हा समन्वयक, जिल्हा समन्वय कक्ष, जिल्हाधिकारी कार्यालय, सिंधुदुर्ग.
७. वित्त विभाग (अर्थ-१६), मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अधिकारी (का.१४२२ / १४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रकल्प संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती.